**राई-मुर्धे खारभूमी योजना ता. जि. ठाणे, या योजनेस प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः खाभूयो २०१६/(११४/१६)/खारभूमी**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दि:- २५ /१०/२०१६

पहावे -

मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांचे पत्र क्र. मुअ/जसंविकोप्र/ खारभूमी/ठाणे/ राई-मुर्धे /तां-२/२०८६ , दि. ०४/०५/२०१६

प्रस्तावना:-

राई-मुर्धे खारभूमी योजना ता.जि.ठाणे, ही खारभूमी, योजना बृहत आराखडयात समाविष्ट आहे. केंद्रीय वन मंत्रालयाने किनारी नियमन अधिनियम १९९१(CRZ) अन्वये या योजनेस सूट दिली आहे. या योजनेची एकूण लांबी ४८९० मी. आहे. सदर योजना मोरवा गावाजवळ ठाणे खाडी लगतची आहे. बांध नसल्याने नियमित भरती-ओहोटी, पूर व अतिवृष्टीमुळे योजनेच्या लाभक्षेत्रात खारे पाणी येत असल्याने शेतक-यांचे नुकसान होत असल्यामुळे ही योजना होणे गरजेचे आहे. त्याकरिता योजना तातडीने हाती घेण्याबाबत ग्राम पंचायत, लाभधारक व लोकप्रतिनिधी यांच्याकडून मागणी करण्यात आल्याने मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई यांच्याकडून संदर्भाधीन पत्रान्वये प्राप्त झालेला राई-मुर्धे खारभूमी योजनेस प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार सदर प्रस्तावासंदर्भात शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय :-**

राई-मुर्धे खारभूमी योजना ता.जि.ठाणे या योजनेस विभागाच्या सन २०११-१२ व सा.बां.वि. दरसूची २०१५-१६ या वर्षाच्या दरसूचीवर आधारित अंदाजित रू.३,११,४८,६६६ (रुपये तीन कोटी, अकरा लक्ष, अठ्ठेचाळीस हजार,सहाशे सहासष्ठ फक्त) इतक्या रकमेस प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. कामाकरिता रु.२,८३,१६,९६९ (रु.दोन कोटी, त्र्याऐंशी लक्ष, सोळा हजार नऊशे एकोनसत्तर फक्त) व अनुषंगिक कामाकरिता रु. २८,३१,६९७ (रु.अठ्ठाविस लक्ष, एकतीस हजार सहाशे सत्त्यानव फक्त) उपशीर्षवार तरतूदीचा गोषवारा सोबतच्या परिशिष्टामध्ये देण्यात येत आहे.

२. योजनेच्या कामावरील खर्च मागणी क्रमांक आय-५, मुख्य लेखाशिर्ष “४४०२ मृद व जलसंधारण यावरील भांडवली खर्च (१०२) मृद संधारण (०१) खार जमीन योजना (०१) बांधकामे (योजनांतर्गत) (४४०२०३८४)” या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व तो मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हा शासन निर्णय वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विअप्र-१०१३/प्र.क्र.३०/२०१३ विनियम, भाग-२ दिनांक १७.४.२०१५ "अन्वये" प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार

आंतरवित्त सल्लागार व उप सचिव तसेच नियोजन विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १५५/का.१४३४, दि. ०१.०८.२०१६ अन्वये दिलेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर कामासाठी विहित मार्गाने तरतूद अर्थसंकल्पित केल्याशिवाय त्यावर खर्च केला जाणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

५. या योजनेस प्रदान करण्यात आलेली प्रशासकीय मान्यता ( १४६/२०१६) अनुक्रमांकावर नोंदविण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१६१०२६१५००१४४०२७ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

**सहपत्र:-** परिशिष्ट अ

Rajendra Baburao Kshirsagar

Digitally signed by Rajendra Baburao Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0d5a1f5709281445b9117f5316c6c720edc1a56ac9bda2e00ed1169efc12f9e9, cn=Rajendra Baburao Kshirsagar
Date: 2016.10.26 15:04:11 +05'30'

**( रा. बा. क्षीरसागर )**
अवर सचिव

**प्रतिलीपी :-**

१. मा. मंत्री (खारभूमी) यांचे स्वीय सहाय्यक मंत्रालय, मुंबई
२. मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
३. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहाय्यक
४. महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर
५. महालेखापाल१/२, महाराष्ट्र राज्य (लेखापरीक्षा), मुंबई / नागपूर
६. मुख्य अभियंता, (दवप्र) व सहसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
७. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई
८. आंतर वित्त सल्लागार व उपसचिव यांचे स्वीय सहाय्यक, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
९. उपसचिव (लघु पाटबंधारे) यांचे स्वीय सहाय्यक,जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१०. प्रकल्प संचालक व अधीक्षक अभियंता, खारभूमी विकास मंडळ, ठाणे
११. अवर सचिव,अर्थ शाखा १/२ (२ प्रती), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. अवर सचिव, वित्त विभाग/अर्थ-२,मंत्रालय, मुंबई
१३. संगणक कक्ष, मंत्रालय, मुंबई-३२
१४. जिल्हाधिकारी, ठाणे.
१५. खारभूमी कार्यासन, संग्रहार्थ.

जलसंपदा विभाग/खारभूमी

**परिशिष्ट-अ**

**शासन निर्णय क्रमांक खाभूयो २०१६/(११४/१६) खारभूमी दिनांक २५/१०/२०१६ चे सहपत्र राई-मुर्धे खारभूमी योजना ता. जि.ठाणे, या अंदाजपत्रकाचा गोषवारा.**

| अ.क्र. | उपशिर्ष | एकूण किंमत रु. |
|---|---|---|
| १ | अे-प्राथमिक | ०.०० |
| २ | बी-भूसंपादन | ०.०० |
| ३ | सी- माती काम | २,२९,०१,१११.०० |
| ४ | एफ( आर.एच.टी. वर्क्स ) | ५४,१५,८५८.०० |
| ५ | के( इमारती) | ०.०० |
| ६ | एम-( वृक्षारोपण) | ०.०० |
| ७ | ओे-(संकीर्ण) | ०.०० |
| ८ | पी-(देखभाल) | ०.०० |
| ९ | आर ( दळणवळण) | ०.०० |
| | एकूण | २,८३,१६,९६९.०० |
| | अनुषंगिक खर्च १० टक्के | २८,३१,६९७.०० |
| | एकूण | ३,११,४८,६६६.०० |

ठळक वैशिष्टये

| | |
|---|---|
| पुन:प्रापित क्षेत्र | १६२ हेक्टर |
| प्रती हेक्टरी किंमत (रु.) | रु.१,९२,२७८/- |
| लाभव्यय गुणोत्तर | १.३१ |

Rajendra Baburao Kshirsagar

Digitally signed by Rajendra Baburao Kshirsagar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=0d5a1f5709281445b9117f5316c6c720edc1a56ac9bda2e00ed1169efc12f9e9, cn=Rajendra Baburao Kshirsagar
Date: 2016.10.26 15:04:26 +05'30'

**( रा.बा. क्षीरसागर )**
अवर सचिव